महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत कृषि महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२५/प्र.क्र.४६/७-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ३१/०३/२०२५.**

**संदर्भ :** १) वित्त विभागाचे शासन परिपत्रक दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४,दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मफुवि-१४२२/प्र.क्र.१८३/७-अे, दि.२५.१०.२०२३.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक-बीयुडी-२०२४/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.३०.०३.२०२५.
४) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.नियंत्रक/अंदाजपत्रकिय निधी मागणी/२५६८/२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकान्वये, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा एकूण अर्थसंकल्पीत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्याच्या सूचना वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. तसेच, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५ च्या परिपत्रकान्वये, कार्यक्रम खर्चाखालील ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाचे प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अधिनस्त कृषि महाविद्यालय, नंदुरबार करीता ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान याबाबीअंतर्गत सुविधा केंद्र इमारत, ग्रंथालय इमारत, जिमखाना इमारत बांधकाम करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत संदर्भ क्र.४ अन्वये नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने, कृषि महाविद्यालय, नंदुरबार करीता ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदानासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता " मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशिर्ष २४०१, पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१ ) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४०१ ८२९१) या योजनेंतर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| योजनेचे नाव व लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ करिता मंजूर सुधारित अंदाज | यापुर्वी वितरीत तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आदिवासी जनजाती क्षेत्र उपयोजनेतंर्गत कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (२४०१ ८२९१) | ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान ( महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत नंदुरबार, कृषि महाविद्यालय) | ३५०.२७ | ७००.०० | ३५०.२७ |
| **एकूण** | | **३५०.२७** | **७००.००** | **३५०.२७** |

२. उपरोक्त अनुदान हे कृषि महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाच्या सुविधा केंद्र इमारत, ग्रंथालय इमारत, जिमखाना इमारत इ. बांधकामाकरीता वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४,दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०२.२०२५ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२. वरील मंजूर अनुदानाचा प्रत्यक्ष खर्च कृषि विद्यापीठाने प्रत्येक महिन्याच्या अखेरीस शासनास सादर करावा. कृषि विद्यापीठाने उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी / कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहिल्यास सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणाऱ्या अनुदानामध्ये समायोजित करावे. तथापि, सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध झालेले अनुदान मंजूर मासिक वितरण विवरणपत्रानुसार खर्च करणे अनिवार्य राहील.

३. उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४. प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट / योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

५. सन २०२४-२५ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

६. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

७. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी वरीलप्रमाणे " मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (कार्यक्रम), (२४०१ ८२९१) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उपशीर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेले उपरोक्त अनुदान नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०२.२०२५ च्या परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन तसेच, आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.३०.०३.२०२५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३३११७३५०८६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2025.03.31 17:36:00 +05'30'

**(मिताली चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मंत्री, कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
८. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर.
९. महालेखापाल, (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) /महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, जिल्हा अहमदनगर.
११. उपकोषागार अधिकारी, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
१२. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४. जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१८. उपसचिव, आदिवासी विकास विभाग(कार्या-६ व कार्या-९) मंत्रालय, मुंबई.
१९. वित्त विभाग (व्यय १ / अर्थसंकल्प - १३ / अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
२०. कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.